अधीक्षक अभियंता (स्थापत्य) यांच्या
बदल्या / नियुक्त्या

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकःटीएफएस-१२१४/प्र.क्र.१५७/सेवा-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २५ ऑगस्ट, २०१४

**संदर्भ :-** शासन आदेश क्रमांक : टीएफएस-१२१४/प्र.क्र.१५७/सेवा-१, दिनांक : ५ ऑगस्ट, २०१४

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री. आर. एस. शिंदे, अधीक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, वरळी, मुंबई यांची अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, नागपूर या रिक्त पदावर बदली करण्यात आली होती. तथापि, प्रशासकीय कारणास्तव श्री. शिंदे यांची अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, नागपूर या पदावर केलेली बदली रद्द करण्यात येत असून, आता, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव श्री. आर. एस. शिंदे, अधीक्षक अभियंता यांची नियुक्ती अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, रत्नागिरी या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. आर. एस. शिंदे, अधीक्षक अभियंता यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून, त्यांच्या पदाचा कार्यभार हा अतिरिक्त कार्यभार म्हणून श्री. एस. ए. वांढेकर, किनारी अभियंता, मुंबई यांचेकडे सोपवावा व त्यांना सध्याच्या पदभारातून तात्काळ पदमुक्त करावे तसेच त्यांना नवीन नेमणुकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यांस रजा मंजूर करु नये.

३. श्री. आर. एस. शिंदे, अधीक्षक अभियंता यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार तात्काळ स्विकारावा तसेच पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास व संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६११४१३२३०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sampat Dasharath Suryavanshi

Digitally signed by Sampat Dasharath Suryavanshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sampat Dasharath Suryavanshi
Date: 2014.08.26 11:38:01 +05'30'

**( सं.द.सुर्यवंशी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/ नागपुर/ विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सह सचिव (सं.नि.), सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई
७. अधीक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, वरळी, मुंबई,
८. अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, नागपूर,
९. अधीक्षक अभियंता, सा. बां. मंडळ, रत्नागिरी,
१०. श्री. आर. एस. शिंदे, अधीक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, वरळी, मुंबई,
११. श्री. एस. ए. वांढेकर, किनारी अभियंता, मुंबई
१२. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
१३. महालेखापाल-१ ( लेखापरीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई,
१४. महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई,
१५. महालेखापाल-२ ( लेखापरीक्षा ) महाराष्ट्र, नागपूर,
१६. महालेखापाल-२ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर,
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

१८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / रत्नागिरी
१९. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
२०. मा. मंत्री (सा.बां. सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव,
२१. मा. मंत्री सा. बां. (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव,
२२. मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव,
२३. मा. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२४. मा. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२५. कार्यासन संगणक कक्ष / सेवा-६ / आस्थापना-३, सा. बां. विभाग मंत्रालय, मुंबई
२६. कार्यासन सेवा-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (निवड नस्तीसाठी).